


**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन ज्ञापन क्र.रापोतप्रा-०४२२/प्र.क्र.६६/पोल-१४**

**२ रा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग,**

**हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.**

**दिनांक:- १९.०३.२०२५**

**विषय:-** राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण कार्यालयाकरिता भाड्याने घेतलेल्या जागेची दि.२८.१०.२०२२ ते दि.३०.०६.२०२३ पर्यंतची देयके अदा करण्याकरिता प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ**:- १) शासन निर्णय, गृह विभाग, क्र. गृहआ-२०१५/प्र.क्र.४४७/आस्था-२, दि.१८.०१.२०१६.

२) शासन निर्णय, गृह विभाग क्र. रापोतप्रा-०४२२/प्र.क्र.६६/पोल-१४, दि.२९.११.२०२२

३) शासन निर्णय, गृह विभाग क्र. रापोतप्रा-०४२२/प्र.क्र.६६/पोल-१४, दि.१९.०४.२०२४

४) राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण कार्यालयाचे पत्र क्र.रापोतप्रा/लेखा/प्र.क्र.४९/२०१९/५४२, दि.२६.०४.२०२४

५) शासन निर्णय, गृह विभाग क्र. रापोतप्रा-०४२२/प्र.क्र.६६/पोल-१४, दि.०२.०८.२०२४

६) राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण कार्यालयाचे पत्र क्र.रापोतप्रा/लेखा/प्र.क्र.४९/२०१९/१५८०, दि.२७.०२.२०२५

७) राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण कार्यालयाचे पत्र क्र.रापोतप्रा/लेखा/प्र.क्र.४९/२०१९/१६२१, दि.१२.०३.२०२५

**ज्ञापन :-**

गृह विभागामार्फत महाराष्ट्र पोलीस (सुधारणा व पुढे चालु ठेवणे), अधिनियम २०१४ अन्वये राज्य पोलीस तक्रार प्राधिकरणाचे गठन करण्यात आले आहे. राज्य पोलीस तकार प्राधिकरण तातडीने सुरु करण्यासाठी एमटीएनएल इमारत, कुपरेज फुटबॉल मैदानासमोर, महर्षी कर्वे मार्ग, मुंबई येथील चौथ्या मजल्यावरील ५९८० चौ.फु. जागा भाडेतत्वावर उपलब्ध करुन घेण्यास संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती.

२. संदर्भाधीन क्र. ५ च्या शासन निर्णयान्वये दि.२८.१०.२०२२ ते दि.३१.१०.२०२४ या कालावधीसाठी एमटीएनएल सोबत करारनामा नुतनीकरण करण्यास विशेष बाब म्हणून शासन मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण व एमटीएनएल यांच्यामध्ये दोन वर्षाचा कालावधी विचारात घेऊन दि.२८.१०.२०२२ ते दि.२७.१०.२०२४ या कालावधीचा करारनामा दि.११.११.२०२४ रोजी करण्यात आलेला आहे.

राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण या कार्यालयासाठी भाड्याने घेतलेल्या जागेचे दि.२८.१०.२०२२ ते २७.१०.२०२४ या कालावधीचे एकूण थकीत भाडे रु.६,७५,१४,८७५/- इतके आहे. त्यापैकी मुख्य लेखाशिर्ष मागणी क्रमांक बी-१, २०५५ ( पोलीस )(००)(०४) राज्य व विभागीय

तक्रार प्राधिकरण ( अनिवार्य ) ( २०५५ ०६९६ ) अंतर्गत १४- भाडेपट्टी व कर या उद्दिष्टाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मूळ अर्थसंकल्पीय तरतूद रु.३,४०,७५०००/- यामध्ये कपात करण्यात येऊन सुधारित अंदाजान्वये रु.२,७२,६०,०००/- इतकी तरतूद अंतीम करण्यात आली आहे. सदर निधीपैकी उपलब्ध असलेल्या निधीतून माहे दि.२८.१०.२०२२ ते ३०.०६.२०२३ या कालावधीचे रु.२,२२,५७,६९०/- इतके थकीत भाडे अदा करणेबाबत प्रशासकीय मंजुरीसाठी संदर्भ क्र.७ अन्वये राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण यांनी सुधारित प्रस्ताव सादर केला आहे.

३. राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण या कार्यालयासाठी दि.११.११.२०२४ रोजी केलेल्या भाडे करारात नमुद दरानुसार व भाडे करारातील अटी व शर्ती प्रमाणे दि.२८.१०.२०२२ ते दि.३०.०६.२०२३ या कालावधीचे थकीत भाडे रु.२,२२,५७,६९०/- ( भाडेकरारात नमुद रु.३८७.८२/- प्रति चौ. फूट या दरानुसार तसेच पार्किंग चार्जेस- रु.२४,०००/- + १८% GST ) ( रुपये दोन कोटी बावीस लाख सत्तावण्ण हजार सहाशे नव्वद फक्त ) इतकी रक्कम अदा करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

४. याबाबतचा खर्च मुख्य लेखाशिर्ष मागणी क्रमांक बी-१, २०५५ (पोलीस) (००) (०४) राज्य व विभागीय तक्रार प्राधिकरण (अनिवार्य) (२०५५ ०६९६) अंतर्गत १४-भाडेपट्टी व कर या उद्दिष्टाखालील सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर निधीतून भागविण्यात यावा.

५. विहीत कार्यपद्धतीचा अवलंब करण्याबाबत तसेच शासन सूचनांचे व नियमांचे अनुपालन झाल्याची खातरजमा करुन खर्च करण्याच्या अटींच्या अधिन राहून तसेच ज्या प्रयोजनासाठी निधी उपलब्ध करून देण्यात आला आहे त्या प्रयोजनासाठीच खर्च करण्याची सर्व जबाबदारी संबंधित नियंत्रण अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी यांची राहिल.

६. हे शासन ज्ञापन वित्त विभाग विअतप्र-२०१३/प्र.क्र.३०/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उप विभाग एक मधील अनु.क्र.६ नियम क्र. ४० मधील तरतुदीनुसार एक वर्षावरील दाव्याचे प्रदान करण्यास तसेच अनु.क्र.१० नियम क्र.११५ आणि महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम १९६५ मधील नियम १४७ (क) खालील टीप-१ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या पूर्ण प्राधिकारानुसार सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३१९१२१२२२४२२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAHUL VIJAY
KULKARNI

Digitally signed by RAHUL VIJAY KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=019d1a40755cacf50cb371c432c67afaec7da5aad928d966ad4270c6a4f1ac39, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=31493D4A6291F531ED8FD00972CCBFA0376623C7F6C38C3B848BFBE06685A219, cn=RAHUL VIJAY KULKARNI
Date: 2025.03.19 17:30:28 +05'30'

**( राहुल कुलकर्णी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-१, महाराष्ट्र -२, नागपूर.

३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-१, महाराष्ट्र -२, नागपूर.

४) मा. अध्यक्ष / सदस्य, राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण, मुंबई.

५) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई

६) अपर पोलीस महासंचालक (आस्था.) तथा सदस्य सचिव, राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण, मुंबई.

७) उप महाप्रबंधक (नियोजन), महानगर टेलिफोन निगम लिमिटेड, १६ वा मजला, टेलिफोन हाऊस, वी.एस. मार्ग, दादर (प.), मुंबई-२८.

८) व्यवस्थापक, महानगर टेलिफोन निगम लिमिटेड, कुपरेज एक्सेंज इमारत, महर्षी कर्वे रोड, मुंबई.

९) उप सचिव (का. २२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) अवर सचिव(अर्थ-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

११) निवड नस्ती, पोल १४, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.